# जर मनात जागा असेल तर

भूतानची एक लोककथा



कुंजंग चोडेन चित्र: पेमा शेरिंग मराठी: अश्विनी बर्वे



थिम्पूच्या पूर्वेला आणि ट्रोंगसाच्या पश्चिमेला उंच पहाडांच्या मध्ये एका छोट्याशा घरात एक म्हातारी स्त्री राहत होती.

एक पांढरी कोंबडी, एक करडी मांजर आणि एक पिवळा कुत्रा तिच्याबरोबर राहत होते आणि ते तिचे स्वयंपाकघर वाटून घेत असत.

एका संध्याकाळी, जसा सूर्यास्त झाला, सावल्या लांब जाऊ लागल्या आणि रात्रीच्या स्वयंपाकाला सुरुवात झाली.  तेव्हा अचानक एक कोमल आवाज ऐकू आला.

"रात्र होणार आहे. माझ्यासाठी जागा आहे का?”





म्हातारीच्या दरवाज्यावर फाटलेले लाल कपडे घातलेला एक साधू उभा होता.

म्हातारीने त्याचे स्वागत केले आणि त्याला आपल्या प्रार्थनेच्या जागे शेजारी सन्मानाने बसवले..

तिने चुलीवर ठेवलेले भांडे हलवले. ती जेवण वाढू लागली तेवढ्यात एक आवाज जोरात आला, “हे पत्र ट्रोंगसापर्यंत वेळ न दवडता पोहचायला हवे, पण माझे पाय खूप थकले आहेत! मी हि दमलो आहे आणि थोडा वेळ आराम करावा वाटत आहे. माझ्यासाठी घरात जागा आहे का?”





एक धापा टाकणारा तरुण म्हातारीच्या दरवाज्याजवळ उभा होता. त्याचे नाव गरबा लुंगी खोरलो (हवेच्या वेगाने पळणारा धावपटू) होता.

म्हातारीने त्याचेही आपल्या घरात स्वागत केले.

म्हातारीने आपली चहाची किटली एका खूंटीवर लटकवली आणि गरबा लुंग खोरलोला बसण्यासाठी जागा दिली.

मग ती भांडं हलवण्यासाठी परत गेली. तेवढ्यात दरवाज्यावर थाप ऐकू आली.

“माझा याक हरवला आहे. पण आता बाहेर खूप अंधार आहे आणि माझ्याजवळ थांबण्यासाठी जागा नाही. माझ्यासाठी या घरात जागा आहे का?





म्हातारीच्या दरवाज्याजवळ गुलाबी गालाची एक स्त्री, याकच्या केसाने माखलेली स्त्री उभी होती.

म्हातारीने तिचेही स्वागत केले.

तिने आपल्या मांडणीच्या खालची एक जागा साफ केली आणि नवीन पाहुण्याला प्रेमाने तिथे बसायला सांगितले.

शेवटी म्हातारी जेवण वाढायला गेली.पण तेवढ्यात कोणीतरी दरवाजा वाजवला.





“आमचे गाढव आता एकही पाऊल पुढे टाकण्यास नकार देत आहे. आम्ही त्याला जोरात धक्का देण्याचा प्रयत्न केला पण त्याचे म्हातारे पाय आता पूर्णपणे थकले आहेत.

आज आम्ही इथे थांबू शकतो का? आमच्यासाठी घरात जागा होईल का?



दोन पुरुष आणि त्यांचे गाढव, म्हातारीच्या दरवाज्याजवळ उभे होते. म्हातारीने आपल्या सर्व पाहुण्यांकडे बघितले आणि आनंदाने म्हटले, “आत या आणि आराम करा.”

मग ते दोघेजण घरात आले.

ते सर्वजन म्हातारीच्या भांड्यातले अन्न वाटून घेण्यासाठी अगदी योग्य वेळेला आले होते. वे

म्हातारीने सर्वांना वाढले: बुढ़िया ने सबको खाना परोसा: एकाला कंदाचा एक तुकडा मिळाला, दुसऱ्याला हाडाचा छोटा तुकडा मिळाला, तिसऱ्याला थोडेसे सूप मिळाले आणि अशा प्रकारे ...

पाहुण्यांनी रात्रीचे जेवण घेतले आणि आपापले वाडगे स्वच्छ केले.

खाल्ल्यावर आणि आराम केल्यावर त्यांनी म्हातारीचे आभार मानले.





“तुमचे एवढे छोटेसे घर असूनही तुम्ही आम्हांला सगळ्यांना जागा देण्यात यशस्वी झालात. तुम्ही हे कसे केले? सगळ्या लोकांनी आश्चर्याने विचारले.

म्हातारी उत्तरादाखल तोंडभरून हसली.



पण सज्जन साधू म्हणाले,

“जर तुमच्या मनात जागा असेल तर तुमच्या घरात नेहमी जागा असते.”





“ माझ्यासाठी जागा आहे का ?”

एका भटक्या भिक्षूने त्या म्हातारीला विचारले जी डोंगरावर राहत होती.हा प्रश्न परत परत विचारला गेला. कारण एका नंतर एक आगंतुक आला.दयाळू म्हातारीने सगळ्यांचे स्वागत केले. पण ते सर्वजण तिच्या छोट्याशा घरात कसे मावले.

भूतानचे प्रमुख लेखक कुंजंग चोडेन यांच्या या आकर्षक कहाणीत औदार्य आणि आत्माच्या उदारतेबद्दल एक महत्वपूर्ण शिकवण आहे.